महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योति) या कंपनीच्या मेमोरेन्डम ऑफ असोसिएशन (Memorandum of Association) प्रमाणे उपक्रम व कल्याणकारी योजना राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग**

**शासन आदेश क्र. सारथी-२०१९/प्र.क्र.१०५ /महामंडळे**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०२०

**वाचा** :- १. विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१९/प्र.क्र१११/मावक, दि. ०८/०८/२०१९

२.इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. सारथी २०१९/प्र.क्र.१०५ /महामंडळे, दि. १९/०९/२०१९.

३. इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. महाज्यो २०२०/प्र.क्र.९७ /महामंडळे, दि. ०६/१०/२०२०

४. इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. महाज्यो २०२०/प्र.क्र.९७ /महामंडळे, दि. २६/१०/२०२०

५. नियोजन विभाग,शासन आदेश क्र. सारथी २०२०/प्र.क्र.४४/का.१४२५,दि.१५/१०/२०२०.

**प्रस्तावना :-**

संदर्भीय शासन निर्णय , इतर मागास बहुजन कल्याण विभाग,दि.०८/०८/२०१९ अन्वये विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील युवक युवतींसाठी विविध उपक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी सारथी या संस्थेच्या धर्तीवर महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेची स्थापना करण्यात आली आहे.

२. वाचा येथील नमूद शासन निर्णय क्र. ३ व ४ अन्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर या संस्थेस एकूण रु.१०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयामध्ये उपक्रम/ योजना राबविण्यासाठी शासनाची पूर्व मान्यता घेणे आवश्यक असल्याचे नमूद केले होते.

३. महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या कंपनीच्या "मेमोरेन्डम ऑफ असोसिएशन" (Memorandum Of Association) व आर्टिकल ऑफ असोसिएशन (Article of Association ) मधील तरतूदी प्रमाणे “संचालक मंडळ” (Board of Director) यांचे मान्यतेने विविध योजना/ प्रकल्प राबविणे व त्यासाठी लागणारा निधी खर्च करणे याबाबतचे निर्णय घेणे आवश्यक होते. त्यानुषंगाने नियोजन विभागाने सारथी या संस्थेसाठी निर्गमित केलेल्या दि. १५/१०/२०२० च्या धर्तीवर उचित आदेश महाज्योती या संस्थेसाठी निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन आदेश-**

महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या कंपनीच्या "मेमोरेन्डम ऑफ असोसिएशन" (Memorandum Of Association) मधील नमूद उद्दिष्ट साध्य करण्यासाठी “संचालक मंडळ” (Board of Director) यांच्या मान्यतेने उपक्रम व कल्याणकारी योजना राबविण्यात स्वायत्तता राहील. आर्थिक वर्षात उपलब्ध होणारा निधी विचारात घेऊन “संचालक मंडळ” (Board of Director) यांचे मान्यतेने "मेमोरेन्डम ऑफ असोसिएशन" (Memorandum Of Association) मध्ये नमूद अनुषंगिक, पुरक उद्दिष्टे (Incidental or Ancillary Object ) पैकी आवश्यक ते उपक्रम व कल्याणकारी योजना यांची निवड करुन अंमलबजावणी करता येईल व संबंधित प्रशासकीय विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणारे तत्सम उपक्रम व कल्याणकारी

योजनाबाबत निश्चित करण्यात आलेले आर्थिक निकष व प्रशासकीय पध्दत इ. विचारात घेऊन "संचालक मंडळ" (Board of Director) यांच्या स्तरावर उचित निर्णय घेता येईल. यासंदर्भात व्यवस्थापकीय संचालक (Managing Director) महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) यांना संबंधित प्रशासकीय विभागाकडून पूर्व सहमती घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६११५९३५०४२२ असा आहे. हे शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JAGTAP AJIT RAMESH

Digitally signed by JAGTAP AJIT RAMESH
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1c57e2746855b8b01d38f9cbd79dc87f2af58135cf485d243d93ebf54c900920, serialNumber=62896254f9fecc7da7b3ba8fdc28bab4a5c1238d1090c223fd8574f24ba7ca52, cn=JAGTAP AJIT RAMESH
Date: 2020.11.06 12:11:36 +05'30'

**(अजित जगताप)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मंबुई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री/राज्यमंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मंबुई.
५. सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद सदस्य.
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन सर्व विभाग.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मंबुई-१/नागपूर -२.
८. महालेखापाल (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य, मंबुई-१/नागपूर -२.
९. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
११.व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर
१२.व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे आयुक्त, समाज कल्याण, पुणे.
१३.शिक्षण आयुक्त, पुणे.
१४.प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नागपूर.
१५.सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मंबुई.
१६.निवडनस्ती (महाज्योती).